**विस्तार व सुधारणा योजनेअंतर्गत जुना मुठा उजवा कालवा कि. मी. ६९ ते ८२ मधील कामाच्या विशेष दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(५२६ /१४)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई
तारीख: ०९ /०९/२०१४

वाचा

शासन निर्णय क्रमांकः कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/०२/ (८५९/१४) /प्रशा १/६९६८ दि. ५ .९.२०१४

**प्रस्तावना**

खडकवासला धरणापासून निघणारा जुना मुठा उजवा कालवा सन १८९० मध्ये बांधण्यांत आला आहे. सदर कालव्यावर हवेली व दौंड तालुक्यातील पाटस पर्यंतचे क्षेत्र ओलीताखाली येत होते. त्यानंतर खडकवासला प्रकल्पाची साठवण क्षमता वाढविण्याचे दृष्टीने पानशेत,वरसगांव व टेमघर ही धरणे बांधण्यांत आली. जुना मुठा उजवा कालव्याचे कि.मी. १९ ते १११ हे वापरात नसल्यामुळे सदर कालव्याची दुरावस्था झाली आहे. परंतु यापुर्वी कि.मी.१९ ते ८२ पर्यंतची कालव्याची मातीकामे व मजबुतीकरणाची बहुतांश कामे पूर्ण झालेली आहेत. पूणे महानगरपालिकेने सांडपाण्यावर प्रक्रिया करुन सिंचनासाठी ६.५० टिएमसी उपलब्ध करुन जूना मुठा कालव्यात पाणी आणून टाकण्यासाठी आवश्यक असलेल्या उपसा सिंचन योजनेचे काम प्रगतीपथावर आहे. नोव्हेंबर २०१४ अखेर ही कामे पूर्ण करण्याची पुणे महानगरपालिकेचे नियोजन आहे.प्रक्रिया केलेले पाणी पिण्यासाठी अयोग्य असल्याने व दौंड शहर,कुरकुंभ औदयोगिक वसाहत वरवंड पाणी पुरवठा योजना,इंदापूर शहर पिण्यासाठीचा पाणी पुरवठा या योजनेंसाठी नवीन मुठा उजव्या कालव्यातून पाणी दिले जात असल्याने प्रक्रिया केलेले पाणी नवीन मुठा उजव्या कालव्यात न सोडता जुना मुठा उजव्या कालव्यात सोडणे आवश्यक आहे त्यामुळे जुना मुठा उजव्या कालव्याची उर्वरित कामे लवकरात लवकर पुर्ण करुन कालवा वापरात आणणे आवश्यक आहे.या कालव्याची संकल्पित विसर्ग क्षमता ४१० क्युसेक्स इतकी आहे. जुना मुठा उजवा कालव्याची कि.मी.६९ ते ८२ मधील नवीन बांधकामा अंतर्गत ५ पुल, ५ मुख्य विमोचक,१ वक्र नियामक /अतिवाहक, १ थेट विमोचक, ४ कॉजवे, २ एचपीसी, ४ जलसेतु व १ लादीमोरी दुरुस्ती आणि कालव्यातील राडारोडा काढणे यांचे या अंदाजपत्रकात समावेश करण्यांत आलेला आहे. प्रस्तावित विस्तार व सुधारणा कामामुळे खालील फायदे अभिप्रेत आहे. १) सांडपाण्यावर प्रक्रिया करुन ६.५० टीएमसी पाणी कि.मी.६९ ते ८२ मधील ४४६५ हे. क्षेत्राच्या सिंचनासाठी वापरण्याचा हा प्रायोगिक प्रकल्प आहे.२) पुणे शहराच्या पाणी वापरामुळे खडकवासला प्रकल्पाच्या सिंचन व्यवस्थेवर निर्माण झालेला ताण ६.५० टीएमसी पाण्याच्या पूर्नवापराने काही अंशी कमी होईल. ३) सध्या प्रदूषित सांडपाणी मुठा नदीमार्फत उजनी जलाशयात जात आहे. प्रस्तुत प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर उजनी जलाशय व मुठा नदीतील प्रदूषण कमी होण्यास मदत होईल.४) शेतीसाठी ६.५० टीएमसी पाण्याची उपलब्धता खडवासला प्रकल्पामध्ये झाल्यावर सध्याचे आवर्तन कालावधी कमी होवून उत्पन्नात वाढ होईल. उपरोक्त होणारे फायदे विचारात घेऊन प्रस्तावित विस्तार व सुधारणा कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा विचार शासनाच्या विचारधीन होता.

## शासन निर्णय

या शासन निर्णयाव्दारे विस्तार व सुधारणा योजनेंअंतर्गत जुना मुठा उजवा कालवा कि.मी. ६९ते ८२ मधील विशेष दुरुस्तीच्या कामाकरीता रु.४७५.९९ लक्ष (कामावरील खर्च रु ४३२.७२ लक्ष व रु ४३.२७ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी

२) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

३) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Miles Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stones साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झालयास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

४) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा (१२)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १६७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ५९ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) ) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१९१९१२८६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:19:42 +05'30'

कि.ल.संखे

शासनाचे कक्ष अधिकारी

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता,पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नाशिक
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/( ५२६ /१४)/ सिंव्य(कामे) दिनांक ०९ .०९.२०१४ चे प्रपत्र

परिशीष्ट

| अ.क्र | कामाचे नांव | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | विमोचकांची कामे | २९०४६७६.०० |
| २ | पुलाची कामे | १४५८५८०२.०० |
| ३ | क्वॉज वे बांधकामे | ३४४७९५७.०० |
| ४ | एच.पी.सी. कामे | ५०१६६५३.०० |
| ५ | जलसेतु दुरूस्ती | ४५२०६६०.०० |
| ६ | काटनियामक व एस्केप | १०६४४७८८.०० |
| ७ | राडारोडा काढणे व स्ट्रक्चरची दुरुस्ती | २१५१७४९.०० |
| | **एकूण** | **४३२७२२८५.००** |
| | **१० टक्के ई.टी.पी.चार्जेस** | **४३२७२२९.००** |
| | **एकूण** | **४७५९९५१४.००** |

| **अ.क्रं.** | शिर्ष/ उपशिर्षनिहाय काम | रक्कम रुपये (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | सी - कामे | २१.५१ |
| २ | डी - विमोचक | २९.०५ |
| ३ | एफ- आर एचटी वर्क्स (एचपीसी, कॉजवे, काटनियामक / अतिवाहक, जलसेतु | २३६.३० |
| ४ | जी- ब्रीज(रस्ता पूल) | १४५.८६ |
| | **एकूण** | **४३२.७२** |
| | ईटीपी चार्जेस | ४३.२७ |
| | **एकदंरीत एकूण** | **४७५.९९** |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.09.09 19:20:10 +05'30'

**कि.ल.संखे**

शासनाचे कक्ष अधिकारी